कोल्हापूर चित्रनगरी महामंडळास भागभांडवली
अनुदान निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : कोचिन-२०२३/प्र.क्र.०६/सां.का.१**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय (विस्तार), मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ३१ मार्च, २०२३

वाचा : १) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र.कोचिन-२०२३/प्र.क्र.०६/सां.का.१, दि.२४ मार्च, २०२३
२) व्यवस्थापकीय संचालक, कोल्हापूर चित्रनगरी महामंडळ मर्यादित यांचे क्र.कोचिन-२०२३, दि.०३.०३.२०२३.

**प्रस्तावना :**

कोल्हापूर चित्रनगरी महामंडळाला भागभांडवली अंशदान (कार्यक्रम) (४२०२ ०७८५) ५४-गुंतवणूक या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ या वित्तीय वर्षात रु.७.०० कोटी एवढा निधी अर्थसंकल्पित करण्यात आला असून, या तरतूदीतून वित्त विभागाने ७०% मर्यादेत रु.४.९० कोटी (रुपये चार कोटी नव्वद लक्ष फक्त) इतका निधी अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणाली (BEAMS) वर उपलब्ध करुन दिला आहे. सन २०२२-२३ या वित्तीय वर्षात भागभांडवली अंशदान म्हणून अपेक्षित निधीच्या अनुषंगाने कोल्हापूर चित्रनगरी महामंडळातील पायाभूत सुविधा उभारण्यासाठीच्या कामास कोल्हापूर चित्रनगरी महामंडळाच्या संचालक मंडळाने मान्यता दिलेली आहे. त्याअनुषंगाने संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये रु.४.९० कोटीच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात आली असून, सन २०२२-२३ या वित्तीय वर्षात कोल्हापूर चित्रनगरी महामंडळाला भागभांडवली अशंदानाकरीता वितरीत करण्यास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सन २०२२-२३ या वित्तीय वर्षात कोल्हापूर चित्रनगरीचा महामंडळातील पायाभूत सुविधा उभारण्यासाठी भागभांडवली अंशदान म्हणून संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये देण्यात आलेल्या प्रशासकीय मान्यतेच्या अनुषंगाने रु.४,९०,००,०००/- (रुपये चार कोटी नव्वद लक्ष फक्त) इतका निधी खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून कोल्हापूर चित्रनगरी महामंडळास वितरणास मान्यता देण्यात येत आहे.

अ) शासनाने भांडवली कामासाठी उपलब्ध करुन दिलेल्या निधीची गणना कोल्हापूर चित्रनगरी महामंडळाच्या भांडवलातील शासनाच्या सहभागात करण्यात यावी.

आ) सदर उपलब्ध निधीतून खर्च करताना शासनाच्या विहित कार्यपध्दतीचा अवलंब काटेकोरपणे करण्यात यावा.

इ) महामंडळाला ज्या प्रयोजनार्थ निधी उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे त्याच प्रयोजनावर निधीचा वापर करण्यात यावा. निधीचा वापर अन्य कोणत्याही प्रयोजनार्थ करण्यात येऊ नये.

ई) शासनाने उपलब्ध करुन दिलेल्या निधीचे सनदी लेखापालांनी प्रमाणित केलेले विहीत नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्र विहित मुदतीत सादर करण्यात यावे.

उ) महामंडळाने केलेल्या खर्चाच्या विवरणाबरोबरच उपरोक्त कामांची प्रगती व भौतिक साध्य याची तपशीलवार माहिती संचालक मंडळाला वेळोवेळी अवगत करण्यात यावी व दर तीन महिन्यांनी विभागाला देखील अवगत करण्यात यावी.

**२.** यासाठी होणारा खर्च “क्र.झेडडी-५, ४२०२, शिक्षण, क्रीडा, कला व संस्कृती यावरील भांडवली खर्च (००) (०२) कोल्हापूर चित्रनगरी महामंडळाला भाग भांडवली अंशदान (कार्यक्रम) (४२०२ ०७८५) ५४-गुंतवणुका” या लेखाशीर्षाखाली सन २०२२-२३ या आर्थिक वर्षातील उपलब्ध तरतुदीतून भागविण्यात यावा.

**३.** या प्रयोजनासाठी उप सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून अवर सचिव (रोख शाखा), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी व्यवस्थापकीय संचालक, कोल्हापूर चित्रनगरी महामंडळ मर्यादित, कोल्हापूर यांना सदर रक्कम एकरकमी वितरीत करावी.

**४.** हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१७१/२०२३/व्यय-१५, दि.३१.३.२०२३ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक क्रमांक २०२३०३३१११११५४३७१२३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIDYA HEMANT WAGHMARE

Digitally signed by VIDYA HEMANT WAGHMARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT,
2.5.4.20=4e214bf8a250420c28c2084d8dd965c0d454568322bd41981d48971712e51795, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F93EFE7B946BF26FF989D6E5E01E1B122B9EB4E3E4E6799CB8E82B2D33D58DFC, cn=VIDYA HEMANT WAGHMARE
Date: 2023.03.31 16:13:23 +05'30'

**( विद्या वाघमारे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) प्रधान सचिव, सांस्कृतिक कार्य यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
३) उप सचिव, सांस्कृतिक कार्य यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
४) व्यवस्थापकीय संचालक, कोल्हापूर चित्रनगरी महामंडळ मर्यादित, कोल्हापूर.
५) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता )-१, महाराष्ट्र ,मुंबई
६) महालेखापाल ( लेखापरीक्षा )-१, महाराष्ट्र, मुंबई
७) नियोजन विभाग (का.१४४३), मंत्रालय, मुंबई
८) वित्त विभाग (सा.उ. /व्यय-१५/अर्थसंकल्प-११), मंत्रालय, मुंबई
९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
११) अवर सचिव (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई. (यांना उक्त अनुदानाची रक्कम BDS द्वारे उपलब्ध करुन देण्यासंदर्भातील कार्यवाहीसाठी अग्रेषित)
१२) अवर सचिव (रोख शाखा), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) निवड नस्ती (सां.का.१).